सुधारीत प्रशासकीय मान्यता
**सिंदखेडराजा, जि.बुलढाणा येथे**
**न्यायालयीन इमारत बांधण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सीसीबी-११२४/प्र.क्र.०२/का-१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ जून, २०२४

**पहा :-**

१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीबी-१११३/प्र.क्र.२०४/का-१३ दिनांक २८ डिसेंबर २०१८

२)मा. प्रबंधक (निरिक्षणे-२), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.बी (डब्ल्यू) ६०६०/२०११ (२६)/४६६/१२१५८, दिनांक ६ मार्च, २०२४.

**प्रस्तावना -:**

सिंदखेडराजा, जि.बुलढाणा येथे न्यायालयीन इमारत बांधण्याकरीता उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये रु.८,५४,९०,०००/- इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. परंतु सदर इमारतीच्या बांधकाम खर्चात वाढ झाल्याने, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांना उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक २ येथील पत्रान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे. सदरहू प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

सिंदखेडराजा, जि.बुलढाणा येथे न्यायालयीन इमारत बांधण्याकरीता रु.९,४०,१६,५८१.०० कोटी (रुपये नऊ कोटी चाळीस लाख सोळा हजार पाचशे एक्क्याऐंशी फक्त) इतक्या खर्चास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | **तपशील** | **सुधारीत प्रशासकीय मान्यता रुपयात** |
|---|---|---|
| अ) | **आवश्यक बाबी** | |
| १. | बांधकामाचा खर्च | ४,४४,६३,४५१.०० |
| २. | अंतर्गत विद्युतीकरण | १०,११,०६०.०० |

| | | |
|---|---|---|
| ३. | बाहय विद्युतीकरण | १२,१३,२७२.०० |
| ४. | पाणीपुरवठा व मलनि:स्सारण | १०,११,०६०.०० |
| ५. | संरक्षण भिंत गेटसह | ७२,३१,०००.०० |
| ६. | अंतर्गत व पोहोच रस्ते | ६०,००,०००.०० |
| ७. | फर्निचर | १,१०,७७,४२०.०० |
| ८. | रेन वॉटर हार्वेस्टींग | १०,००,०००.०० |
| ९. | अग्निशमन यंत्रणा | २५,००,०००.०० |
| १०. | भूविकास | १०,००,०००.०० |
| ११. | माती परिक्षण | ३,००,०००.०० |
| १२. | वाहनतळ | १५,००,०००.०० |
| १३. | Arboriculture | ११,००,०००.०० |
| १३. | सी.सी.ड्रेन | ५,११,०५०.०० |
| १४. | सोलार एनर्जी यंत्रणा | १५,००,२४७.०० |
| १५. | आकस्मिक खर्च | ८,०८,८४८.०० |
| १६. | भाववाढ | ७२,८९,१७३.०० |
| **ब)** | **वैकल्पिक बाबी** | |
| १७. | वॉटरमेन स्टोरेज पंप हाऊस बोअरवेल | २०,००,०००.०० |
| १८ | Air Conditioning and acoustics for Auditorium | ५,००,०००.०० |
| १९. | Transformer, MSEB Charges, DG set | २०,००,०००.०० |
| | **एकूण** | **९,४०,१६,५८१.००** |

२. ही सुधारीत प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेवूनच सुरु करावे.

२) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना मा.प्रमुख मुख्य जिल्हा व सत्र न्यायाधिश, बुलढाणा यांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

३) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

४) सदर कामाची निविदा काढताना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

५) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था / प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

९) अंदाजपत्रकीय कामात बदल होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नये.

११) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास, याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागातील तसेच अन्य संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी "मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम-कार्यक्रमांतर्गत-(०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा) (२१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३ - मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१५०/२०२४/ इमा-२, दिनांक २८ मे, २०२४, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक ९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६२६१३०९१६८११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2024.06.26 13:21:08 +05'30'

**( विलास वसंत गायकवाड )**
**विधि सल्लागार- नि- सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
४) मा. प्रबंधक बी (डब्ल्यू) शाखा, मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५) मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, बुलढाणा
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.
८) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलढाणा. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०) उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, देऊळगाव राजा, बुलढाणा
११) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) नियोजन विभाग-१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५) कक्ष अधिकारी, का. ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन-१३).